नांदेड जिल्हा कारागृह येथे महिला बंद्याकरिता अतिरिक्त बराकी बांधण्यासाठी येणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक- बीएलडी-०३२१/२/प्र.क्र.११/पीआरएस-२.

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- १३ ऑगस्ट,२००१.

वाचा :- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- बांधकाम/१७५६/३२१ (अ) / कक्ष-३,दिनांक २३.७.२००१.

२) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम, दिनांक ११.७.२००१.

<u>शासन निर्णय:-</u> नांदेड जिल्हा कारागृह येथे महिला बंद्यासाठी अतिरिक्त बराकी बांधण्याकरिता येणाऱ्या खर्चाच्या रु. २,६७,१५४/- च्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता द्यावी अशी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी विनंती केली आहे. कारागृह महानिरीक्षक यांनी असेही स्पष्ट केले आहे की, नांदेड जिल्हा कारागृहातील महिला बंदी विभागामध्ये एकच लहान बरॅक आहे. या बरॅकमध्ये केवळ ८ ते १० महिला बंदी राहू शकतात. तथापि त्यापेक्षा जास्त महिला बंदी कारागृहात दाखल झाल्यास त्यांना सामावून घेण्याची व्यवस्था नसल्यामुळे त्यांना परभणी जिल्हा कारागृहात पाठवावे लागते.

२. नांदेड जिल्हा कारागृह येथे महिला बंद्याकरिता अतिरिक्त बराकी बांधण्यासाठी येणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यासंबंधीच्या कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब काही काळ शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन शासन वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक-विअप्र- १०००/ प्र.क्र.४६ /२००१/विनियम दिनांक ११.७.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग पाच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत विवरण पत्रातील अ.क्र.१,परिच्छेद क्र.१३४ तसेच खाली नमूद केलेल्या काही अटींच्या अधीन राहून या आदेशाद्वारे नांदेड जिल्हा कारागृह येथे महिला बंद्याकरिता अतिरिक्त बराकी बांधण्यासाठी येणारा खर्च रु. २,६७,१५४/- च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देत आहे.

१) अर्थसंकल्पीय तरतूद केल्याखेरीज प्रशासकीय मान्यतेबरोबर वित्तीय मान्यता गृहीत धरु नये.

२) अर्थसंकल्पात प्रत्यक्ष तरतूद केल्याखेरीज बांधकामास सुरुवात करु नये.

३) प्रशासकीय मान्यता मिळालेल्या अनुदानातच बांधकामाचा खर्च भागविण्यात यावा.त्यासाठी जादा अनुदान मंजूर करण्यात येणार नाही.

४) यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली कामे प्रथम पूर्ण करण्यात यावीत व त्यानंतरच सदरचे काम हाती घेण्यात यावे.

४. यासाठी होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, १०१-बांधकाम,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,प्रमुख बांधकामे - (००) (१०) - (तुरुंग)" (४०५९०११७) मागणी क्रमांक-एच-८ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग व नियोजन विभागाच्या संमतीने तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४३/१४११/ दिनांक १७.७.२००२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(र. ना. माळी)

कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

अपर पोलीस महासंचालक कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक, ( मध्य विभाग ) मध्यवर्ती कारागृह, औरंगाबाद.
अधिक्षक,जिल्हा कारागृह,नांदेड.
कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग मंडळ,नांदेड.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता)नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा )नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी,नांदेड.
वित्त विभाग(व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
नियोजन विभाग(कार्यासन-१४११)मंत्रालय,मुंबई
सार्वजनिक बांधकाम विभाग(इमारत -२)मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती- पीआरएस-२.